**उप प्रादेशिक परिवहन कार्यालय नागपूर (पूर्व) या कार्यालयासाठी नागपूर सुधार प्रन्यास यांची जागा घेणेसाठी निधी अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पकाजा-०७१२/प्र.क्र.३४२/पु.बां.-२६/परि-४**
२ रा मजला, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ३१ मार्च,२०१५

वाचा

**१) शासन निर्णय क्रमांकः गृह विभाग क्र. एमव्हीडी-०७१०/प्र.क्र.३४२/परि-४(२), दि. २४/०८/२०११.**

**२) शासन निर्णय क्रमांकः नगर विकास विभाग क्र. नासुप्र-२०१५/प्र.क्र.४९/नवि-२६, दि. ३१/०३/२०१५.**

**शासन निर्णय -**

गृह (परिवहन) विभागाच्या संदर्भाधीन दि. २४/०८/२०११ च्या शासन निर्णयान्वये उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (पूर्व) स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर कार्यालयासाठी नागपूर सुधार प्रन्यासाच्या खसरा क्र. ८३, ८४/१ मौजा चिखली (देवस्थान) अभिन्यासातील १८०७९ चौ.मि. जागेसाठी सन २०१४ च्या शीघ्र गणकानुसार होणा-या प्रव्याजी रक्कमेच्या २५ टक्के दराने रक्कम आकारण्याबाबत तसेच सदर जागेसाठी वार्षिक भूभाटक रक्कम २५ % दराप्रमाणे प्रव्याजी रक्कमेनुसार आकारण्याबाबत संदर्भाधीन दिनांक ३१/०३/२०१५ च्या शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहे. त्यानुसार सदर जागेसाठी अदा करावयाच्या रक्कमेपैकी रुपये ४,००,००,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी फक्त) एवढी रक्कम नागपूर सुधार प्रन्यास यांना अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक बी-१०, ४०७० इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००)(८००) इतर खर्च (००) (००) (०४) परिवहन कार्यालयासाठी भूसंपादन (४०७० ०११३) ५० इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. यासाठी लेखा अधिकारी , प्रादेशिक परिवहन कार्यालय (नागपूर शहर) यांना सदर रक्कम आंहरित करुन, नागपूर सुधार प्रन्यास यांना निधी अदा करण्यासाठी आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय नियोजन आणि वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे १६२/१४६१ दि. ३०/०३/२०१५ आणि २२२/१५/व्यय ८ दि. ३१/०३/२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०११२४६२७८०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash K Sabale

Digitally signed by Prakash K Sabale
DN: CN = Prakash K Sabale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.04.01 12:56:33 +05'30'

**(प्रकाश साबळे)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) महालेखापाल १ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र, नागपूर.
४) प्रादेशिक परिवहन कार्यालय, नागपूर (शहर)
५) उप प्रादेशिक परिवहन कार्यालय , नागपूर (पूर्व)
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
७) अध्यक्ष नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
८) नियोजन विभाग (१४६१) मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग (व्यय ८) मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती, परिवहन ४ .